अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक,गट-अ (राजपत्रित) या संवर्गातून सहसंचालक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील पदावर पदोन्नतीने पदस्थापना देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्र.पदोनि-१०२५/प्र.क्र.०३/का.१४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ६/६/२०२५.

**वाचा :-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/ कार्यासन १२, दिनांक ०१/०८/२०१९.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७/०५/२०२१.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीसीसी-२०२१/प्र.क्र.४५६/१६-ब (ए), दिनांक ३०/०६/२०२१.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक: दिव्यांग २०१५/प्र.क्र.१७१/१६-अ, दिनांक ०५/०७/२०२१.
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन अधिसूचना क्रमांक: एसआरव्ही-२०२०/ प्र.क्र.४९/कार्या.१२, दिनांक १४/०७/२०२१.

**शासन आदेश :-**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-अ (राजपत्रित) (वेतनस्तर रुपये S-२३ : ६७७००-२०८७००) या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद १५ अधिकाऱ्यांना सहसंचालक, गट-अ (राजपत्रित) (वेतनस्तर रुपये S-२५ : ७८८००-२०९२००) या संवर्गात खालील परिच्छेद-२ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून या आदेशान्वये निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून, पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना त्यांच्या नांवासमोर स्तंभ-६ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | उपसंचालक, गट-अ (राजपत्रित) यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | प्रवर्ग | पसंतीचा महसूल विभाग | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १ | श्री. हे. बा. अहिरे,<br>उपसंचालक,<br>जिल्हा सांख्यिकी कार्यालय,<br>नाशिक. | इमाव | नाशिक | नाशिक (१) | उपायुक्त (नियोजन),<br>विभागीय आयुक्त कार्यालय,<br>नाशिक.<br>(रिक्त पदावर) |

| अ.क्र. | उपसंचालक, गट-अ (राजपत्रित) यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | प्रवर्ग | पसंतीचा महसूल विभाग | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| २ | श्रीमती नि. रु. पाटील, उपसंचालक (प्रशासकीय माहिती) , अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई | अ.जा. | कोकण-२ | कोकण-२ (१) | मुख्य संशोधन अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई. (रिक्त पदावर) |
| ३ | श्री. ग. रु. वायाळ, वरिष्ठ संशोधन अधिकारी, अप्पर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कार्यालय, नाशिक. | इमाव | नाशिक | नाशिक (२) | सहआयुक्त (नियोजन), आदिवासी विकास यांचे कार्यालय, नाशिक. (रिक्त पदावर) |
| ४ | श्री. सुनिल झि. जाधव, उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, पुणे. | इमाव | पुणे | पुणे (१) | सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, पुणे. (रिक्त पदावर) |
| ५ | श्री. अ. द. गोतमारे, उपसंचालक, विभागीय आयुक्त कार्यालय, (नक्षलग्रस्त भाग विशेष कृती आराखडा कक्ष), नागपूर. | इमाव | नागपूर | नागपूर (२) | उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर. (रिक्त पदावर) |
| ६ | श्री. सं. श्री. मरकळे, उपसंचालक, जिल्हा सांख्यिकी कार्यालय, पुणे. | खुला | पुणे | पुणे (२) | उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे. (रिक्त पदावर) |
| ७ | श्री. यो. अ. चौधरी, जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, नाशिक | इमाव | नाशिक | छत्रपती संभाजीनगर (१) | सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, छत्रपती संभाजीनगर. (रिक्त पदावर) |
| ८ | श्री. रविंद्र पुं. काळे, खाजगी सचिव, मा. उपमुख्यमंत्री, नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) (श्री. एकनाथ शिंदे) यांच्या आस्थापनेवर प्रतिनियुक्तीने कार्यरत. | इमाव | कोकण-२ | कोकण-२ (२) | प्रपत्र बढती - खाजगी सचिव, मा. उपमुख्यमंत्री, नगर विकास, गृहनिर्माण, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) (श्री. एकनाथ शिंदे) यांच्या आस्थापनेवर प्रतिनियुक्तीने कार्यरत असेपर्यंत |

| अ.क्र. | उपसंचालक, गट-अ (राजपत्रित) यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | प्रवर्ग | पसंतीचा महसूल विभाग | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| ९ | श्री. सु. हे. आग्रेकर,<br>विशेष कार्य अधिकारी,<br>तिर्थक्षेत्र विकास कार्यक्रम कक्ष, शेगांव, विभागीय आयुक्तांचे कार्यालय, अमरावती. | खुला (दिव्यांग) | नागपूर | नागपूर (१) | सहसंचालक,<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय,<br>प्रादेशिक कार्यालय,<br>नागपूर.<br>(रिक्त पदावर) |
| १० | श्री. ज. द. मेहेत्रे,<br>जिल्हा नियोजन अधिकारी,<br>जिल्हा नियोजन समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय,<br>रायगड. | इमाव | कोकण-२ | कोकण-२ (३) | सहसंचालक,<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय,<br>प्रादेशिक कार्यालय, नवी मुंबई.<br>(रिक्त पदावर) |
| ११ | श्री. भी. यो. बिरादार,<br>वरिष्ठ प्रकल्प संचालक,<br>(सांख्यिकी व मूल्यमापन),<br>छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे. | खुला | कोकण-२ | कोकण-२ (४) | सहसंचालक,<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय,<br>मुख्य कार्यालय, मुंबई.<br>(रिक्त पदावर) |
| १२ | श्रीमती अ. सु. वैरागडे,<br>वरिष्ठ संशोधन अधिकारी,<br>अप्पर आयुक्त आदिवासी यांचे कार्यालय, नागपूर. | खुला | नागपूर | छत्रपती संभाजीनगर (२) | सहसंचालक,<br>मृद व जलसंधारण आयुक्तालय,<br>छत्रपती संभाजीनगर.<br>(रिक्त पदावर) |
| १३ | श्री. उ. श्री. सुर्यवंशी,<br>विशेष कार्य अधिकारी,<br>कामगार आयुक्त कार्यालय,<br>मुंबई | खुला | कळविला नाही. | छत्रपती संभाजीनगर (३) | सहसंचालक,<br>मराठवाडा विकास मंडळ,<br>छत्रपती संभाजीनगर.<br>(रिक्त पदावर) |
| १४ | श्री. मु. र. वाडेकर,<br>विशेष कार्य अधिकारी,<br>मा.मंत्री, आदिवासी विभाग,<br>(डॉ. अशोक वुईके) यांच्या आस्थापनेवर प्रतिनियुक्तीने कार्यरत | भज-ब | कोकण-२ | कोकण-२ (५) | प्रपत्र बढती -<br>विशेष कार्य अधिकारी,<br>मा.मंत्री, आदिवासी विभाग,<br>(डॉ. अशोक वुईके) यांच्या आस्थापनेवर प्रतिनियुक्तीने कार्यरत. |

| अ.क्र. | उपसंचालक, गट-अ (राजपत्रित) यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | प्रवर्ग | पसंतीचा महसूल विभाग | वाटप केलेला महसूल विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १५ | श्री. वि.दि. भोपळे,<br>जिल्हा नियोजन अधिकारी,<br>जिल्हा नियोजन समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय,<br>कोल्हापूर. | अ.जा. | कोकण-२ | कोकण-२ (६) | सहसंचालक,<br>उर्वरित महाराष्ट्र विकास मंडळ, मुंबई.<br>(रिक्त पदावर) |

२. सदर पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर आदेशानुसार पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्वीकारावा व तसे केल्याबद्दलचे कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे. तसेच त्याची एक प्रत आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अग्रेषित करावी. पदोन्नती स्वीकारावयाची  नसल्यास त्याबाबत लेखी स्वरुपात शासनास कळवावे.

२) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ४/८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीतील आरक्षण अवैध ठरविले असल्याने व मा.सर्वोच्च न्यायालयाने मा.उच्च न्यायालयाच्या या निर्णयास अद्याप स्थगिती दिली नसल्याने पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दिनांक २५/५/२००४ च्या स्थितीनुसार सेवाज्येष्ठतेने भरण्याबाबतचा निर्णय सामान्य प्रशासान विभागाच्या दिनांक ७/५/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला.

३) सदर पदोन्नत्या निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ वरिल अंतिम निर्णयाच्या अधीन असतील.

४) रिट पिटिशन स्टॅम्प नं. १०८७६ / २०२१ व रिट पिटिशन स्टॅम्प नं. १०८७८ / २०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिनांक २५/०५/२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

५) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

६) सदर अधिकाऱ्यांनी पदोन्नतीच्या पदावर तात्काळ रुजू होणे आवश्यक आहे.

७) या आदेशान्वये पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

८) सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १२/९/२०१६ च्या शासन निर्णयान्वये  "वरच्या संवर्गात पदोन्नतीसाठी निवड झाल्यानंतर अथवा तत्पूर्वीच एखाद्या अधिका-यांने पदोन्नतीचे पद स्विकारण्यास नकार दर्शविल्यास, त्याचे नांव पदोन्नतीसाठी पात्र असणा-या अधिका-यांच्या निवड यादीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणा-या निवडसूच्यांमध्ये संबंधित अधिका-यांच्या नावाचा विचार न करता तिस-या वर्षाच्या निवडसूचीत संबंधित अधिका-यांची पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येईल.  त्यावेळच्या गुणवत्तेप्रमाणे संबंधित अधिकारी पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्याचा नियमित निवडसूचीत समावेश करण्यात येईल". पदोन्नतीचा कार्यभार स्विकारल्यानंतर पदोन्नती नाकारता येणार नाही.

९) या पदोन्नती आदेशातील ज्या अधिकाऱ्यांना कालबध्द पदोन्नती/आश्वासित प्रगती/सुधारित सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा फायदा मिळालेला नाही त्यांची महाराष्ट्र नागरी सेवा

(सुधारित वेतन) नियम, २०१९ नुसार पदोन्नतीच्या पदाच्या वेतनश्रेणीतील वेतन निश्चिती करण्यात यावी.

१०) सदर आदेश निर्गमित झाल्यापासून ३० दिवसांच्या आत पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्विकारावा. या पदोन्नती आदेशातील जे अधिकारी आदेश प्राप्त झाल्यानंतर विहित कालावधीत पदोन्नती स्विकारणार नाहीत किंवा विविध सबबी खाली पदस्थापना स्विकारण्यास टाळाटाळ करतील त्याना वित्त विभाग, शासन निर्णय क्र:वेतन-१११९/प्र.क्र.३/२०१९/सेवा-३, दिनांक २/३/२०१९ नुसार सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित सेवांतर्गत प्रगती योजनेखाली मंजूर केलेले लाभ काढून घेण्यात येतील. तथापि, अशा लाभांची वसुली करण्यात येणार नाही. तसेच असे लाभ काढून घेतल्यानंतर संबंधितांची वेतननिश्चिती ही त्यांना जणू काही या योजनेचे लाभ देण्यात आले नव्हते असे समजून महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम १२ च्या तरतुदींनुसार करण्यात येईल.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०६१६५२५२२६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

LATIKA VIVEK PATIL

Digitally signed by LATIKA VIVEK PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=1c4b49a56ff92b0c2302bfbfa5229e6a2bbc1d7ad665186f2cdb07c85b6d7f5e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F2E420294905BF4B07C5FF20F3668B9BBE325263C711E71C8BEC3DF7BA0D8A19, cn=LATIKA VIVEK PATIL
Date: 2025.06.06 16:55:16 +05'30'

**(लतिका वि. पाटील)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (मार्फत :- अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री (नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास, गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (*पत्राने)
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/ २, मुंबई/ नागपूर
८. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्तांचे कार्यालय, (सर्व)
९. सदस्य सचिव, उर्वरीत महाराष्ट्र विकास मंडळ, मुंबई.
१०. सदस्य सचिव, मराठवाडा विकास मंडळ, छत्रपती संभाजीनगर.
११. आयुक्त, मानवविकास आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर.
१२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१३. आयुक्त, कामगार आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.

१४. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालये (सर्व).
१५. आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१६. सहसचिव / उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२ / १६-ब), मंत्रालय, मुंबई.
१७. उपसचिव (मा. मंत्री आस्थापना), मंत्रालय, मुंबई.
१८. सहसचिव / उपसचिव (सर्व), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालये (सर्व)
२०. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालये (सर्व)
२१. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
२२. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालये (सर्व)
२३. उपसंचालक, जिल्हा सांख्यिकी कार्यालये (सर्व).
२४. लेखा अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२७. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालये (सर्व)
२८. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२९. निवडनस्ती.

*******